केंद्रपुरस्कृत कारागृह उदयोगाच्या विकासासाठी
लागणारी साधनसामुग्री खरेदी करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
शासन निर्णय क्रमांक- बीजीटी ०१२०/६/प्र.क्र.६८/पीआरएस-२.
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२. दिनांक :- ३ मार्च, २००३.

__वाचा:-__ १) गृह विभाग,शासन निर्णय क्र. बीजीटी ०१२०/६/प्र.क्र.६८/पीआरएस-२ दिनांक ७.२.२००२.

२) कारागृह महानिरीक्षक,महाराष्ट्र राज्य,पुणे यांची क्र. पंचवार्षिक योजना २००१-२००२/क,६(१), दि. १९.४.२००२ व क्रमांक- एफसीटी /पंवायो/ २००२-२००३/१३३६/कक्ष-६,दिनांक ३१.१.२००३ ची पत्रे.

३) गृह विभाग क्र. एसयुपी ०२०८/प्र.क्र.१०३/बीयुडी-१, दि. ३ जानेवारी, २००३ चे पत्र.

__शासन निर्णय:-__ कारागृह उदयोगाचा विकास करण्याकरिता लागणारी साधनसामुग्री खरेदी करण्यासाठी शासनाने गृह विभाग,शासन निर्णय क्र. बीजीटी ०१२०/६/प्र.क्र.६८/पीआरएस-२, दिनांक ७.२.२००२ च्या शासन निर्णयाद्वारे आर्थिक वर्ष २००१-२००२ मध्ये रु. २०,३२,०००/-इतके अनुदान खर्च करण्यास मान्यता देण्यात आलेली होती. तथापि कोषागार कार्यालयाने " शासनाची अर्थोपाय उपाययोजना " म्हणून कारागृह विभागाची सदरची देयके पारीत केली नाहीत.

२. कारागृह महानिरीक्षक,पुणे यांच्या कार्यालयाने त्यांच्या उपरोक्त दिनांक १९.४.२००२ च्या पत्रान्वयें कारागृह उदयोगाचा विकास करण्यासाठी मागील वर्षात नामंजूर झालेले अनुदान चालू आर्थिक वर्ष २००२-२००३ मध्ये मंजूर करावे अशी शासनास विनंती केली होती. कारागृह महानिरीक्षक यांच्या विनंतीनुसार कारागृह उदयोगाचा विकास या केंद्रपुरस्कृत योजनेतंर्गत ( ५० टक्के राज्य व ५० टक्के केंद्र ) आवश्यक असलेली साधनसामुग्री खरेदी करण्याकरिता शासनाने चालू आर्थिक वर्षाकरिता रु. २०,३२,०००/- (रुपये वीस लाख बत्तीस हजार फक्त) इतके अनुदान पुरवणी मागणीद्वारे उपलब्ध केले आहे.

३. कारागृह उदयोगाचा विकास या केंद्रपुरस्कृत ( ५०:५० ) योजनेतंर्गत लागणारी साधनसामुग्री खरेदी करण्यासाठी निधी उपलब्ध करून देण्याबाबत कारागृह महानिरीक्षक महाराष्ट्र राज्य पुणे यांनी शासनास केलेल्या विनंतीचा सहानूभूतीपूर्वक विचार करून शासन या आदेशाद्वारे आर्थिक वर्ष २००२-२००३ मध्ये रु. २०,३२,०००/-( रुपये वीस लाख बत्तीस हजार फक्त ) इतके अनुदान खर्च करण्यास मान्यता देत आहे.

४. यासाठी होणारा खर्च मागणी क्र.बी-५,"मुख्य लेखाशिर्ष २०५६- तुरुंग, १०१ तुरुंग - पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (००)(०४) कारागृह उदयोगाचा विकास (२०५६००६२) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. व आर्थिक वर्ष २००२-२००३ मध्ये पुरवणी मागणीद्वारे मंजूर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

५. हा शासन निर्णय वित्त विभाग शासन निर्णय क्र.विअप्र १०००/प्र.क्र.४६/२००१/विनियम, दिनांक ११.७.२००१ व वित्तिय अधिकार नियमपुस्तिका,१९७८ भाग पहिला, उपविभाग-३ मधील अनुक्रमांक ४, परिच्छेद क्र. २७(२)(अ) अन्वये मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या वित्तिय अधिकाराचा वापर करून निर्गमित करण्यांत येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( र. ना. माळी )
कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन,गृह विभाग

प्रति,
कारागृह महानिरीक्षक ,महाराष्ट्र राज्य,पुणे.
कारागृह उपमहानिरीक्षक (मुख्यालय) , महाराष्ट्र राज्य,पुणे.
कारागृह उपमहानिरीक्षक,पुणे / नाशिक
कारागृह अधिक्षक, येरवडा खुले कारागृह/कोल्हापूर /नागपूर/ नाशिक.
महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता)मुंबई./नागपूर.
महालेखापाल ,महाराष्ट्र-१ /२ (लेखा परिक्षा)मुंबई /नागपूर.
जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
वित्त विभाग (व्यय-८) (अर्थ-१० ) मंत्रालय,मुंबई.
नियोजन विभाग (का.१४३१),मंत्रालय,मुंबई
अवर सचिव (पोल-१) गृह विभाग,मंत्रालय,मुंबई.
निवड नस्ती पोल-१२.